आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे स्मारक सिधुदुर्गनगरी-ओरोस येथील स्मारकाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्मारक-२०१६/प्र.क्र.१९२/पंरा-९**
सार्वजनिक बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांक :- १७ नोव्हेंबर, २०१६

**वाचा:-** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.स्मारक-३११३/प्र.क्र.३०८/२९, दिनांक २१ ऑगस्ट, २०१३
२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.३/पंरा-९, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६.

**प्रस्तावना:-**

जिल्हाधिकारी कार्यालय, सिधुदुर्ग यांचे दिनांक २१/७/२०१६ च्या पत्रान्वये, आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे स्मारक व पत्रकार भवन मौजे सिंधुदुर्गनगरी-ओरोस येथील स्मारक बांधकामासाठी रु.४५५/- लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी पंचावन्न लक्ष फक्त) इतक्या किमंतीचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेकरिता सदर केला होता.

सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमती करिता सादर केला असता सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रस्ताव तपासून रुपये ४५५/- लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी पंचावन्न लक्ष फक्त) इतक्या प्रकल्प किंमत व अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे मौजे सिंधुदुर्गनगरी-ओरोस येथील स्मारक व पत्रकार भवनाच्या बांधकामाच्या रुपये ४५५/- लक्ष (अक्षरी रुपय चार कोटी पंचावन्न लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या आराखडे व अंदाजपत्रकांना या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र.स्मारक२०१६/प्र.क्र.०३/पंरा-९, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६ मधील परिच्छेद- ३ (३) अन्वये शासकीय निधीतून शासकीय जागेवरच स्मारक उभारण्यात यावे अशी स्पष्ट तरतूद आहे. तथापि, आद्य प्रत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे स्मारक व पत्रकार भवनाचे बांधकाम सूरू करण्यापूर्वी स्मारकाची जागा शासनाच्या किंवा जिल्हापरिषद यांच्या नावे हस्तांतरीत करुन घेण्यात यावी. या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक-एल-३, मुख्य लेखाशीर्ष, २५१५, इतर ग्राम विकास कार्यक्रम
३१, सहायक अनुदान (वेतनेतर)
(००) (०६) थोर व्यक्तीची स्मारके उभारण्याकरीता अनुदान (२५१५२४८६)

४. उपरोक्त निधीतून खर्च करण्याकरिता सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, सिंधुदुर्ग (सांकेतांक क्रमांक १५०१००१०३९ ) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांना नियंत्रकीय अधिकारी मळणून घोषित करण्यात येत आहे. सदर स्मारकावरील खर्चाची जबाबदारी जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांची राहील. त्यांनी स्मारकाच्या कामाची प्रगती तसेच निधी उपयोगिता संबंधीची माहिती, उपयोगिता प्रमाणपत्रास वेळोवेळी शासनास सादर करावी व महालेखापालांच्या लेख्याशी खर्चमेळाबाबतची कार्यवाही करावी.

५. वित्तीय अधिकार नियम पुस्तीक १९७८ भाग पहिला उपविभाग तीन, अनुक्रमांक-४ नियम-२७ (२) अन्वये, अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रुपये पाच कोटी पर्यंतच्या मर्यादेत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकारी प्रशासकीय विभागास आहेत. यानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४१०, दिनांक१०/११/२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१३२००२२६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Uttam Rathod

Digitally signed by Subhash Uttam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subhash Uttam Rathod
Date: 2016.11.18 13:22:23 +05'30'

**( सुभाष राठोड )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सविच, मंत्रालय, मुंबई
५. मा.पालक मंत्री, सिंधुदुर्ग जिल्हा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. विभागीय आयुक्त पुणे.
८. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
११. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१२. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा) मुंबई.
१३. सहायक जिल्हा नियाजन अधिकारी, सिंधुदुर्ग.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सिंधुदुर्ग.
१५. कक्ष अधिकारी, का-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.
१६. कार्यासन अधिकारी, (इमा-१ व इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन पंरा-९ संग्रहार्थ.